ee

कोषागार सुरक्षा कक्ष
महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे
साहित्य, इत्यादी ठेवण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन निर्णय क्रमांक :मुंविनि-१०९५/प्र.क्र.५०/९५/विनियम,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १० डिसेंबर, १९९६.

निर्णय

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत महाराष्ट्रातील बहुतेक जिल्हयांमध्ये वेगवेगळ्या पदांसाठी स्पर्धा परीक्षा घेतल्या जातात. परीक्षांच्या प्रश्नपत्रिका, उत्तरपत्रिका व इतर साहित्य कोषागार सुरक्षा कक्षात ठेवण्याकरिता सध्या महाराष्ट्र लोकसेवा आयोगाला प्रथम संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य यांना विनंती करावी लागते व नंतर संचालनालय, लेखा व कोषागारे, कोषागार अधिका-यांना महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे परीक्षा साहित्य कोषागारात ठेवून देण्यासाठी जरुर ते आदेश देते. सध्या या स्पर्धा परीक्षा सतत होत असल्यामुळे अशी परवानगी मिळण्यासाठी फार कमी अवधी प्राप्त होतो. त्यामुळे अनेक अडचणी उद्‌भवतात. ही बाब महाराष्ट्र लोकसेवा आयोग आणि लेखा व कोषागारे संचालनालय यांनी शासनाच्या निदर्शनास आणून दिलेली आहे. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाला अशी परवानगी देण्याबद्दलची बाब काही काळ शासनाच्या विचाराधीन होती. शासन आता असे आदेश देत आहे की, मुंबई वित्तीय नियम, १९५९ मधील नियम १४ नुसार पुढील बाबींच्या अधिन राहून कोषागार अधिकारी, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या परीक्षेच्या प्रश्नपत्रिका, उत्तरपत्रिका व इतर साहित्य कोषागार सुरक्षा कक्षात ठेवण्यास परवानगी देऊ शकतील.

१] परीक्षेच्या प्रश्नपत्रिका, उत्तरपत्रिका व इतर साहित्य सिलबंद पेटयातून स्वीकारण्यात यावे.

२] सिलबंद पेटयातून स्वीकारलेले वरील साहित्य परीक्षेच्या पूर्वी व नंतर अशा एकूण एक आठवडयाच्या कालावधीसाठी सुरक्षा कक्षात ठेवण्यात यावे.

वरील निर्णयानुसार योग्य ते बदल मुंबई वित्तीय नियम १९५९ मधील

[कृ.मा.प.]

नियम क्र. ४४ मध्ये यथावकाश करण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ बा. के. कुळकर्णी ]
अवर सचिव, वित्त विभाग.

प्रति,

* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
उप संचालक, लेखा व कोषागार, कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व उप कोषागार अधिकारी,
निवड नस्ती, वित्त विभाग, विनियम.

* पत्राव्दारे.